<u>शासकीय मान्यता-</u>
**पाटण, जि.सातारा येथे नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अतिरिक्त बांधकामे करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीबी-१११९/प्र.क्र.२०/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १८ फेब्रुवारी, २०२०.

**पहा :-** १) प्रबंधक (निरिक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)६०४५/२०१२(२९)/१६५, दि. २१.०१.२०२० चे पत्र.
२) जिल्हा न्यायालय, सातारा यांचे जा.क्र. ६१५५/ २०१९, दि. ०९.१२.२०१९ चे पत्र.

<u>प्रस्तावना</u> :-

उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ च्या पत्रान्वये, पत्रान्वये पाटण, जि.सातारा येथे नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अतिरिक्त बांधकामे करण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला होता. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

**पाटण, जि.सातारा येथे नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये अतिरिक्त बांधकाम करण्याकरीता रु.२,२१,९२,०००/- (रुपये दोन कोटी एकवीस लक्ष ब्याण्णव हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | फर्निचर | ९०,९७,७५४/- |
| २ | संरक्षक भिंत | ६५,५३,४९२/- |
| ३ | फ्लॅग पोस्ट | ६१,४९०/- |
| ४ | पोहोच रस्ता | ९,९५,१८७/- |
| ५ | Royalty | ७१,२६९/- |
| ६ | Testing | ५०,८००/- |
| ७ | लिफ्ट | २५,००,०००/- |
| | वस्तू व सेवा कर (एकूण किंमतीच्या १२%) | २०,०४,९५१/- |
| | आकस्मिक खर्च (४ %) | ७,७३,२००/- |
| | कामगार विमा (०.५%) | ८३,५४०/- |
| | **एकूण खर्च रुपये:-** | **२,२१,९१,६८२/-** |
| | **म्हणजेच एकूण रुपये:-** | **२,२१,९२,०००/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना- केंद्र हिस्सा), (२१) (०१) मोठी बांधकामे(कार्यक्रम),५३-मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/ईमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ नूसार सक्षम प्राधिकाऱ्याने तांत्रिक मान्यता प्रदान केल्यानंतर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या शिफारशीनूसार व नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक ससामा-२०१०/ प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दिनांक ११ जून २०१८ अन्वये आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र:-विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१८१५२१३३६११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.02.18 15:23:10 +05'30'

**(उदय बा. शुक्ल)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

२.मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

३.मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४.मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५.मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सातारा.
६.मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
८.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
९.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सातारा.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११. उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, पाटण.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१३. सार्वजनिक बांधकाम विभाग (ईमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४. वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५. नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६. अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१८. कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. निवड नस्ती/संग्रहार्थ.